# एका विशिष्ट जागी जाणे!

पेट्रीसिया मैककिसैक

मराठी: अश्विनी बर्वे



ट्रिसिया ऐन उत्साहाने पूर्ण भरलेली होती.

आपली बोटे बांधून आणि आपली डोळे बंद करून, तिने आपला प्रश्न विचारला. “फ्रांसिस आजी, मी आज विशिष्ट जागी जाऊ शकते का? मला माहीत आहे की बस मधून कुठे उतरायचे आहे आणि कोण-कोणत्या रस्त्याने जायचे आहे ते.”

खरेतर त्या जागेचे दुसरे काहीतरी नाव होते,पण ट्रिसिया ऐन नेहमी त्याला "विशेष स्थान“ म्हणत असे कारण ते जगातील सगळ्यात आवडीचे तिचे ठिकाण होते. “मी त्या टेकडीवर जाऊ शकतो का? टेकडीवर त्या इमारतीत आपल्या मार्शमॉलोबरोबर जाऊ?”

“मी तुला जगात हरवून टाकण्यासाठी तयार नाही,” आईने उत्तर दिले, तिने ट्रिसिया ऐनच्या पोशाखाची पट्टी बांधली. “हे बघ, एकटीने जाणे हे खूप मोठे बदल आहे.”

“मी त्यासाठी तयार आहे,” मुलीने फरशीवर एक मोठी उडी मारत म्हटले. “बघ, मी किती उंच उडी मारू शकते?”





फ्रांसेस आजी खूप वेळ आपल्या नातीच्या चेहऱ्याचा अभ्यास करत हसली. “मला विश्वास आहे की तू त्या सर्व गोष्टी लक्षात ठेवशील ज्या मी तुला सांगितल्या आहेत.”

“मी ज़रूर लक्षात ठेवेन,” ट्रिसिया ऐन आत्मविश्वासाने म्हणाली. अचानक, तिच्या चेहऱ्यावर एक मोठं हास्य आले. “तर तुझे म्हणणे आहे की मी जाऊ शकते?”

“हे बघ, मी माझा विचार बदलण्याच्या आधी तू इथून निघ.”

आपली पिशवी खांद्यावर टाकून ट्रिसिया ऐनने आपल्या आजीला धन्यवाद म्हटले. मग ती दरवाज्यातून बाहेर पडली आणि फुटपाथवर चालू लागली.

“बघ एक गोष्ट लक्षात ठेव,” फ्रांसिस आजी मागून म्हणाली, “आपली मान ताठ ठेऊन चाल आणि अशी वाग जसे काही तुझ्याबरोबर कोणीतरी आहे.”



कोपऱ्यावर एक हिरवी आणि सफेद रंगाची बस झटका देऊन थांबली. जेव्हा बसचा दरवाजा उघडला तेव्हा ट्रिसिया ऐनने पेटीत आपले भाडे टाकले जसे की तिची फ्रांसेस आजी तिच्याबरोबर आहे.

मुलीने आपल्या खांद्याला झटका दिला आणि ती मागे जाऊ लागली. ती "जिम-क्रो" चिन्हाच्या मागे असणाऱ्या एका बाकड्यावर जाऊन बसली, तिथे लिहलेले होते: **काळ्यांसाठी** .



ट्रिसिया ऐनने आपल्या पूर्ण आयुष्यात अशी चिन्हे बघितले होते. जेव्हा तिला आठवले की तिने आणि फ्रांसेस आजी प्रथम या बसने प्रवास केला होता, “ते चिन्ह आम्हांला सांगतात की आपण कुठे बसायचे आहे, पण ते आपल्याला आपण काय विचार करायचा हे सांगू शकत नाही.”

“मी एका विशेष स्थानाच्याबाबत विचार करते आहे,” ट्रिसिया ऐन स्वतःला म्हटले आणि ती खिडकीतून बाहेर बघू लागली.

प्रत्येक स्टॉपवर बस अजून भरू लागली. बाजारातल्या भाज्या-फळे यांच्या पिशव्या घेऊन लोकांची गर्दी उसळली. शिवण काम करणारे फ्रांसिस आजीचे मित्र मिसेज़ ग्रैनेल बोर्डला चढले. जशी ती मागे जाऊ लागली, ट्रिसिया ऐनने बघितले की "जिम-क्रो“ चिन्हाच्या मागे एकही जागा रिकामी नव्हती. म्हणून ती उठली आणि उभी राहिली आणि तिने मिसेज़ ग्रैनेलला आपली जागा दिली.

“हे योग्य नाही,” तिने पुढच्या रिकाम्या जागांकडे बघत म्हटले.

“पण असेच असते, मुली,” मिसेज़ ग्रैनेलने म्हटले.

“मला समजत नाही की हे असे का?” तिने सुरु केले. पण तोपर्यंत बस कैपिटल स्क्वायर म्हणजे ट्रिसिया ऐनच्या स्टॉपवर पोहचली होती. दरवाजे उघडले आणि ती लवकरच बाहेर पडली.

“आपली मान वर करून चाल,” मिसेज़ ग्रैनेल, बसच्या खिडकीतून ओरडली.



आपली टोपी पकडत, ट्रिसिया ऐन, पीस फाउंटेनचा सुंदरसा वाटर-शो बघण्यासाठी थांबली. हवेत उंच उडणारे कारंज बघतांना ट्रिसिया ऐनचे डोके गरगरू लागले. पण तिला त्याची जाणीव आवडली आणि तिने आपले हात पसरून गोल-गोल गिरक्या घेतल्या. मग हसत आणि डगमगणाऱ्या पावलांनी एका बाकड्यावर जाऊन बसली.




त्वरित ट्रिसिया ऐन उडी मारून बसली. बाकड्यावर एक ओळ लिहलेली होती: **केवळ गोऱ्या लोकांसाठी**

तिचा चेहरा पडला आणि तिच्या मनात फ्रांसिस आजीचा मजबूत हात धरावा असे आले. “मूर्खपणा दर्शवणारी ओळ,” ती कुजबुजत शांत पायांनी तिथून पुढे गेली.

चौकात तिने फेरीवाला जिमी-लीला अभिवादन केले. “तुझा चेहरा इतका उदास का आहे?“ त्याने ट्रिसिया ऐनला एक मोफत प्रेट्ज़ेल देत विचारले.

"जिम-क्रो कायद्याने मला वेडे केले आहे!” ट्रिसिया ऐन म्हणाली. “माझे आजोबा पीस फाउंटेन बांधणारे एक राजमिस्त्री होते. मी तिथे बसून त्याचा आनंद का घेऊ शकत नाही?”

जिमी-लीने मुनरो रेस्टारंटच्या खिड़कीवर लावलेल्या चिन्हाकडे बोट दाखवले. तो म्हणाला, “माझा भाऊ त्यांना वाढण्यासाठी पदार्थ तयार करतो,पण तो त्यांच्या एखाद्या टेबलवर बसून त्यांच्या बरोबर जेऊ शकत नाही.” मग हसत हसत म्हणाला, “असे नाही की मला माझा भाऊ जेस्सीने तयार केलेले पदार्थ मला आवडतात.पण कोणीही काळा माणूस तिथे पाणीही पिऊ शकत नाही.”

ट्रॅफिक लाइट बदलले गेले आणि ट्रिसिया ऐन सावधानपूर्वक रस्त्यावरून चालू लागली. “जिम-क्रोच्या संकेताकदे बघून आपला आनंद बरबाद करू नको,” जिमी-ली मागून ओरडला.



ट्रिसिया ऐनने आपले खांदे मागे केले आणि तिने त्या उबदार आणि स्वागत करणाऱ्या जागेच्या बाबत विचार केला, जिथे रंगभेदाचे कुठेही नावनिशाण नसेल. १० व्या गल्लीनंतर तिने दसवीं फिलिंग स्टेशन पार केले, आणि जिमी-लीने दिलेले प्रेट्ज़ेल खाल्ल्यानंतर ती एक कोल्ड ड्रिंक खरेदी करण्यासाठी थांबली.

दुसऱ्या ट्रैफिक लाइटनंतर साउथलैंड हॉटेल तिच्यासमोर एका सुंदर महालाच्या रुपात उभे होते. हॉटेलचा रक्षक मिस्टर जॉन विलिसने तिच्याकडे बघितले आणि म्हटले, “असे वाटते कि स्वर्गातून एक देवदूत इथे आली आहे,” ते हसत म्हटले.

ट्रिसिया ऐन त्यांच्याकडे बघून हसली. मिस्टर जॉन विलिस नेहमी चांगल्या गोष्टी सांगत असत. “नाही सर.मी फक्त ट्रिसिया ऐन आहे."

“तुझ्या चेहऱ्यावर हसू आहे, पण डोळ्यात नाही,” ते म्हणाले.



तेव्हा दोन पोलिस सुरक्षाकर्मी बरोबर एक लांब सफेद कर हॉटेलच्या समोर थांबली. काळे चमकदार केस आणि लाजाळू डोळे असणारा माणूस कारमधून बाहेर आला. अचानक सगळीकडचे लोक ओरडू लागले आणि त्याच्याकडे सही मागण्यासाठी पळू लागले, त्याच्याकडे भीक मागू लागले. ट्रिसिया ऐन गर्दीत अडकली आणि त्याच्याबरोबर ओढली जाऊ लागली.

ती नेहमी विचार करत असे की त्या लांबलचक जिन्याच्या रेड कार्पेटवरून चालतांना कसे वाटेल, किंवा एकाच वेळी लाखो हिऱ्यांच्या झुंबराच्या प्रकाशाखाली उभे राहिल्यावर कसे वाटेल? आता ती साउथलँड हॉटेलच्या भव्य लॉबीत मधोमध उभी होती.



कोणीतरी ट्रिसिया ऐनकडे इशारा केला. “ती इकडे काय करते आहे?”

असे वाटले की साऱ्या जगाने बोलणे आणि हलणे बंद केले आहे आणि ते सगळे तिच्याकडे बघत आहे. प्रबंधकाने गर्दीला धक्का दिला. “तुला काय वाटते? तू आत कशी आली आहे? काळ्या लोकांना आत येण्याची परवानगी नाही!” आणि मग त्याने ट्रिसिया ऐनला दूर करण्याचा प्रयत्न केला.

ट्रिसिया ऐन आपली मान हलवत मागे गेली. “माझा इथे येण्याचा हेतू नव्हता...” ती म्हणाली. पण खरे तर तिला रडू वाटत होते.



मिस्टर जॉन विलिसकडून निघून, ट्रिसिया ऐन सरळ मिशन चर्चच्या खंडहर भागात गेली, जिथे फ्रांसिस आजी नेहमी आराम करण्यासाठी थांबत असे. तिथे चार भिंतीच्या सुरक्षेत बिचारी स्फुंदून स्फुंदून रडू लागली. “एखाद्या विशेष स्थानावर जाण्यासाठी एवढे कष्ट घेण्याची गरज नाही,” ती म्हणाली. मी आता घरी जात आहे.”

“माझ्या फुलांना आधीच पाणी घातले आहे वाटते,” वरून एक आवाज आला.ती ब्लूमिंग मैरी नावाची एक बुजुर्ग महिला होती, ती कोणाच्या परवानगी शिवाय आणि पगाराशिवाय बागेची देखभाल करत असे. सगळेजण म्हणत की ती नशेत असते, पण फ्रांसिस आजीला असे वाटत नव्हते. "ब्लूमिंग मैरी एक दयाळू आणि कोमल आत्मा आहे," तिने ट्रिसिया ऐनला सांगितले होते.

“तू हरली का बाळा?” महिलेने विचारले.

आपला आवाज स्थिर करण्याचा प्रयत्न करत, ट्रिसिया ऐनने उत्तर दिले. “नाही, मॅडम. जर माझी आजी इथे असती तर त्या विशेष ठिकाणी जाण्यास मला तिने मदत केली असती.”

“तू तिथे कसे पोहचू शकत नाही.”

“ते खूप कठीण काम आहे. त्यासाठी आजीची गरज आहे.”

ब्लूमिंग मैरीने मान हलवली आणि त्याबाबत विचार केला.

मग ती म्हणाली, “मला विश्वास आहे की तुझी आजी इथेच आहे,जशी यावेळेस बोलतांना माझी आजी माझ्याबरोबर आहे. जवळून ऐक, आणि ते तुला ऐकु आले की मला सांग.”





ट्रिसिया ऐनला सुरुवातीला काही ऐकू आले ती भुंग्याची गुणगुण होती. ब्लूमिंग मैरी कशाच्याबाबत बोलत होतीस?

पण जस-जसा तो आवाज तिने जवळून ऐकला, तिला आपल्या आजीचा स्थिर आवाज ऐकू येऊ लागला. "तू एक माणूस आहे-तू जगात कोणापेक्षाही उत्तम नाही, तसेच कोणापेक्षाही वाईट नाही. कोणत्याही विशेष स्थानावर पोहचणे सोप्पे नाही. पण विचार सोडण्याऐवजी तू सतत ध्येयाकडे चालत रहा. आणि मग एक दिवस तू जरूर आपल्या मुक्कामावर पोहचशील."

ट्रिसिया ऐनने हे शब्द या शांत जागी अनेक वेळा आठवले. ते खूप सुखदायी शब्द होते. आता तिला एकटे वाटत नव्हते. तिने आपले डोळे पुसले आणि आपली टोपी सरळ केली. "तुमचे म्हणणे खरे आहे मॅडम," ब्लूमिंग मैरीला म्हटले " फ्रांसिस आजी इथे आहे. आणि तिला आवडणार नाही मी परत गेलेली."

"चला, तू हरवलेली नाहीस," ब्लूमिंग मैरीने ट्रिसिया ऐनला एक चमकणारे नारंगी झिननियाचे फूल देत म्हटले.

"नाहीं, मॅडम मी हरवलेले नाही." आणि मग तिला अच्छा म्हणत ती एका निश्चयाने पुढे गेली.

दोन ब्लॉकनंतर ट्रिसिया ऐन, ग्रैंड म्यूजिक पैलेसपर्यंत पोहचली, जिथे काही लोक मैटिनी शोसाठी एकत्र आले होते. ट्रिसिया ऐनजवळ येत एका छोट्या मुलाने म्हटले, “तू कशी आहेस,मी हिक्की आहे आणि मी आज सहा वर्षाचा झालो, तू आतमध्ये शो बघायला येत आहे का?”

ट्रिसिया ऐन काही उत्तर देण्याच्या आधी एका मोठी मुलीने त्या मुलाचा हात पकडला. “गप्प बस,” तिने आपले दात खात म्हटले. “काळे लोक समोरच्या दरवाज्याने आत येऊ शकत नाही. त्यांना मागच्या दाराने आत जाऊन मागच्या सिटवर जाऊन बसावे लागेल. तुला हे हि माहित नाही? त्याची बहीण जोरात म्हणाली.

हिक्कीने ट्रिसिया ऐनकडे विस्मयकारी नजरेने पहिले. “तू तिथे बसणार आहेस का?”

“बाल्कनीच्या शेवटच्या तीन ओळींमध्ये? तिथे मी बिलकुल बसणार नाही, जरी तिथे जानेवारीत टरबूज उगवले असले तरी. याशिवाय मी एका विशिष्ट जागी जात आहे-एक खूप विशेष जागी,” ट्रिसिया ऐनने उत्तर दिले. आणि मग ती तिथून निघून गेली.

"मलाही तिथे जायचे आहे जिथे ती जात आहे : तिने हिक्कीला हे म्हणतांना ऐकले .पण त्याच्या बहिणीने त्याला दरवाज्यातून आत ढकलले.





कोपऱ्यात ट्रिसिया ऐनने एक खूप उंच इमारत बघितली, जी उन्हात चमकत होती. ती इमारत विटा आणि दगडांपेक्षा अधिक होती. ती एक इमारत नव्हती तर एक विचार होता. फ्रांसिस आजी तिला स्वतंत्रतेचे दार म्हणत असे.जेव्हा ट्रिसिया ऐनने तिच्याकडे बघितले, तेव्हा तिला राग आणि लाज वाटली नाही. “शेवटी,” ती कुजबुजली. “मी त्या विशेष जागी येऊन पोहचली आहे.”

जिन्यावरून जाण्याच्या आधी आणि समोरच्या दरवाज्यातून आत जाण्याच्या आधी ट्रिसिया ऐन आपल्या समोर, दगडात छन्नीने कोरलेला संदेश वाचण्यासाठी थांबली:

**सार्वजनिक वाचनालय : इथे सर्वांचे स्वागत आहे.**



## लेखकाचे मत

ही माझी स्वतःची कहाणी आहे. यातले सेटिंग काल्पनिक आहे, पण घटना माझ्या बालपणातल्या आहेत जेव्हा मी नैशविले, टेनेसीमध्ये लहानाची मोठी होत होते.

१९५०च्या दशकात अधिकांश दक्षिणी शहरांसारखे नैशविलेमध्ये पण वंशीय रंगभेदाचा बोलबाला होता. हॉटेल, रेस्तरां, चर्च आणि मनोरंजन पार्कचे दरवाजे "जिम क्रो" या वेगळ्या चिन्हाने भरलेले होते. ज्यामुळे काळ्या लोकांना बंधन घातलेले होते. त्यांना बसमध्ये मागच्या बाजूला बसून प्रवास करण्यासाठी आणि वेगळ्या ठिकाणी पाणी पिण्यास मजबूर करत असत. पण १९५०च्या दशकाच्या उत्तरार्धात नैशविलेच्या सार्वजनिक पुस्तकालयाच्या निदेशक मंडळाने गुपचूप त्यांच्या सर्व सुविधा सर्व रंगाच्या लोकांसाठी उघड्या करण्याचे ठरवले. हाई डाउनटाउन शाखा त्या काही स्थानामधली एक होती जिथे "जिम-क्रो" चे संकेत नव्हते आणि अश्वेत लोकांबरोबर सन्मानाने व्यवहार केला जात असे.

अधिकांश अफ्रीकी-अमेरिकी आईवडील तोपर्यंत वाट बघत असत जोपर्यंत त्यांची मुले भेदभावाला तोंड देण्यासाठी परिपक्व होत नाही. त्यानंतर ते आपल्या मुलांना समुहात बाहेर जाण्याची परवानगी देत असत. मी जवळपास बारा वर्षांची होते जेव्हा माझ्या आईवडीलानी माझ्यावर विश्वास दाखवला आणि मला एकटीला पुस्तकालयात जाण्याची परवानगी दिली.पण ट्रिसिया ऐन सारखे मलाही कोणत्याही परिस्थितीचा सामना करण्यासाठी पुरेसे प्रेम, सन्मान आणि अभिमानासहित मोठे केले होते. रस्त्यात मला प्रत्येक प्रकारच्या भेदभावाचा सामना करावा लागला.पण माझ्यासाठी, पुस्तकालय नेहमी एक विशेष होते. त्यानंतर माझ्या प्रयत्नांचे सार्थक झाले.तिथे माझे स्वागत झाले, म्हणून मी तिथली पुस्तकांना उलटेपालटे करून वाचली. तेव्हा मला माझ्या आजीने सांगितलेली गोष्ट समजली, की वाचनालय, हॉटेल, फिल्म थिएटर, रेस्तरां आणि मनोरंजन पार्कांच्या तुलनेत वाचनालय अधिक रोमांचक आणि रोचक असतात. एंड्र्यू कार्नेगी ज्यांनी शेकडो महान पुस्तकांच्या निर्मितीत मदत केली होती, त्याच्यासारखेच माझ्या आजीचे म्हणणे होते की, “वाचन, स्वतंत्रता प्राप्त करण्याचे एक द्वार असते.”



